मागासवर्गीय बेरोजगारांना स्वयंरोजगारासाठी
सामाजिक न्याय विभागाच्या नियंत्रणाखालील
महामंडळामार्फत रु.२५,०००/- ची कर्ज योजना

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :महामं २००४/प्र.क्र.३८/विघयो-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २००४

**प्रस्तावना** :- मागासवर्गीय घटकांच्या आर्थिक विकासाच्या विविध योजना राबविण्याकरीता राज्यात पाच महामंडळे स्थापन करण्यात आली आहेत. सध्या रु.२५,०००/- पेक्षा कमी रकमेचे कर्ज केंद्र शासनाच्या महामंडळाच्या कक्षेत येत नाही. म्हणून राज्यातील अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागासवर्ग इ.प्रवर्गातील दारिद्रयरेषेखालील घटकांच्या आर्थिक उन्नतीसाठी तसेच त्यांना स्वयंरोजगाराच्या अधिकाधिक संधी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने रु.२५,०००/- चे कर्ज २% व्याज दराने महामंडळाकडून देण्याची योजना राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- शासन आता उपरोक्त बाब विचारात घेवून अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागासवर्ग या प्रवर्गातील दारिद्रय रेषेखालील लाभार्थीकरीता स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने रुपये २५,०००/- च्या थेट कर्ज योजनेस मंजूरी देत आहे. या कर्ज रकमेवर २% व्याज आकारले जाईल. मात्र यावर अनुदान दिले जाणार नाही.

**योजनेचा उद्देश :-**

(१) मागासवर्गीय घटकांची आर्थिक उन्नती करणे तसेच बँकेमार्फत कर्ज देताना येणाऱ्या अडचणी व कर्ज मंजूर होताना होणारा विलंब टाळणे.

(२) मागासवर्गीय घटकांच्या हिताच्या दृष्टीकोनातून त्यांना स्वयंरोजगारास प्रोत्साहित करणे.

(३) मागासवर्गीय घटकातील लोकांना आर्थिकदृष्टया सक्षम करणे.

(४) मागासवर्गीय दुर्बल घटकाच्या लोकांना व्यवसाय करण्याकरीता तात्काळ वित्त पुरवठा करणे.

(५) सदर योजनेसाठी लघु व्यवसाय उदा.मासळी विक्री, भाजीपाला विक्री, फळ विक्री, किराणा दुकान, आठवडी बाजारामध्ये छोटेसे दुकान, टेलिफोन बुथ किंवा अन्य तांत्रिक लघु उद्योग अशा लघु व्यवसायासाठी ही योजना सुरु करणे.

.....२/-

(६) मागासवर्गीय घटकांतील निराधार विधवा महिला इ.लाभार्थींना तात्काळ लाभ देणे आणि त्यांना प्राथमिकता देणे.

२. शासन पुढे असेही आदेश देत आहे की, उपरोक्त योजना खालील अटी व शर्तीवर राबविण्यात येईल :-

(१) ज्या प्रकरणात लाभार्थींना तारण देणे शक्य नसेल त्या प्रकरणात कर्जाचे धनादेश लाभार्थींना न देता उद्योग व्यवसायांसाठी ते लाभार्थी ज्यांचेकडून माल / यंत्रसामुग्री खरेदी करतील त्यांचे नावे कर्जाचे धनादेश देण्यात यावेत. त्याचवेळी अशा लाभार्थींकडून कर्जाच्या परतफेडीच्या रक्कमेचे पुढील दिनांकाचे आगावू धनादेश घेण्यात यावेत.

(२) सदर कर्जातून लाभार्थींसाठी जी मत्ता निर्माण होणार आहे, ती ज्यांच्याकडून निर्माण होईल त्यांचेकडून ती मत्ता स्थावर (अचल Immovable ) असेल तर परस्पर संबंधित मागासवर्ग विकास महामंडळाकडे गहाण ( Mortgage) ठेवण्यात यावी. जर ती मत्ता जंगम (चल Movable) असेल तर ती महामंडळाकडे तारणगहाण (Hypothecate ) ठेवण्यात यावी.

(३) लाभार्थीबरोबर कर्जाबाबत करावयाचे करारपत्र जिल्हा नोंदणी निबंधकाकडे नोंदणी करणे.

(४) या योजनेवर होणारा खर्च शासनाने महामंडळासाठी मंजूर केलेल्या तरतुदीच्या मर्यादेत असावा.

(५) महामंडळाने आपला भांडवली अर्थसंकल्प विहित कालमर्यादेत शासनाकडून मान्य करुन घेणे बंधनकारक आहे.

(६) मुद्दल व व्याजासह कर्जाच्या वसुलीचा तपशील महामंडळाने भांडवली अर्थसंकल्पात देणे बंधनकारक राहील.

(७) एक जामीनदार हा शासकीय / निमशासकीय / अनुदानीत संस्था इ. सेवेतील असावा किंवा जमीनधारक असावा. कर्जाचा परतफेडीचा कालावधी व जामीनदार अलीकडील काळात सेवानिवृत होत असेल तर सेवानिवृत्तीचा कालावधी जवळजवळ सारखा असावा. तसेच शासकीय / निमशासकीय / अनुदानीत संस्थांतील जामीनदाराकडून तो काम करीत असलेल्या संस्थेकडून / कार्यालयातून हमीपत्र घेण्यात यावे.

(८) दुसऱ्या जामीनधारकाकडे लाभार्थीला दिलेल्या कर्जाइतकी स्थावर मालमत्ता अथवा जमीनजुमला असणे आवश्यक आहे. त्याच्याकडे असलेल्या शेतीवर अथवा मालमत्तेवर महामंडळाने दिलेल्या कर्जाचा बोजा उतरविण्यात यावा.

(९) लाभधारकाचे स्वत:चे निवास असेल तर महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषदा अथवा ग्रामपंचायत यांच्या कर पावतीवर कर्जाची नोंद घेण्यात यावी.

....३/-

३. **लाभार्थ्यांची पात्रता :-**

(१) अर्जदार अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग, इतर मागासवर्ग प्रवर्गातील असावा.

(२) अर्जदार महाराष्ट्राचा रहिवासी असावा.

(३) अर्जदाराचे वय १८ ते ५५ वर्षे असावे.

(४) अर्जदार महामंडळाचा, बँकेचा अथवा कोणत्याही वित्तीय संस्थेचा थकबाकीदार नसावा.

(५) ग्रामीण भागातील अर्जदाराचे वार्षिक उत्पन्न रु.३९,३०८/- आणि शहरी भागातील अर्जदाराचे वार्षिक उत्पन्न रु.५४,४९४/- यापेक्षा जास्त नसावे.

(६) एका कुटुंबातील एकाच व्यक्तीस सदर योजनेचा लाभ घेता येईल.

(७) लाभार्थ्याने ज्या व्यवसायासाठी अर्ज केलेला आहे तो व्यवसाय करण्याकरीता लागणारे तांत्रिक कौशल्य / प्रशिक्षण / शैक्षणिक अर्हता (पदविका / पदवी / तांत्रिक अर्हता ) आवश्यक राहील.

४. **लाभार्थ्याची निवड व कर्जाची वसुली :-**

कर्ज योजनांसाठी योग्य लाभार्थ्यांची निवड करण्याची तसेच महामंडळामार्फत देण्यात येणाऱ्या कर्जाच्या वसुलीची संपूर्ण जबाबदारी संबंधित मागासवर्ग विकास महामंडळाची राहील. याबाबत सर्वसाधारणपणे पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरण्यात यावी. त्यामध्ये आवश्यकतेनुसार बदल करण्याचे अधिकार महामंडळास रहातील. परंतु त्यामुळे योग्य लाभार्थ्यांची निवड होईल व कर्ज वसुलीवर परिणाम होणार नाही याची काळजी महामंडळाने घ्यावी.

(१) महामंडळाच्या सर्व कर्ज योजनांची कर्ज प्रकरणे प्राप्त झाल्यानंतर जिल्हास्तरावर त्याची छाननी संबंधित अधिकाऱ्याकडून करण्यात यावी. यामध्ये पुढील बाबी विचारात घेणे अनिवार्य राहील.

(अ) उद्योग / व्यवसायाची वर्धनक्षमता

(ब) लाभार्थ्यांची सक्षमता / व्यवसायाचे ज्ञान

(क) परतफेडीची क्षमता / जामीनदारांची क्षमता

(२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र.महामं १०/२००३/प्र.क्र.२३६/विघयो-२, दि. नोव्हेंबर,२००४ अन्वये गठीत केलेल्या लाभार्थी निवड समितीमार्फत लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

(३) कर्ज परतफेडीचा कमाल कालावधी हा ४८ महिने राहिल. तथापि, कुकुटपालन, दुग्धव्यवसाय याकरीता ६० महिन्याचा कर्ज परतफेडीचा कालावधी राहील.

....४/-

(४) कर्जाची परतफेड ही कर्ज वितरीत केल्याच्या सहाव्या महिन्यापासून सुरु करण्यात येईल.

(५) तसेच कर्ज परताव्याचे मासिक / त्रैमासिक हप्ते ठरवून द्यावेत व कर्ज वसुलीच्या दृष्टीने महामंडळाने लाभार्थ्यांकडून पुढील दिनांकाचे आगावू धनादेश घ्यावेत आणि वसुली नियमित होईल असे पहावे.

(६) एवढे करुनही वसुली न झाल्यास महामंडळाकडे ठेवलेल्या तारणाद्वारे तसेच जामिनदाराद्वारे कर्ज वसुली करण्यात यावी.

(७) जामीनदाराकडून कर्ज वसुली शक्य न झाल्यास जमीन महसूल संहितेच्या कलम २२१ नुसार जिल्हाधिकारी यांना याबाबत माहिती देवून कर्ज वसुली करण्यात यावी.

५. सदरील थेट कर्ज योजना खालील महामंडळातील लाभार्थ्यांकरीता लागू राहील :-

१) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ,मुंबई.
२) लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ,मुंबई.
३) वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ,मुंबई.
४) संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ,मुंबई.
५) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळ,मुंबई.

६. एक वर्षानंतर योजनेचा फेरआढवा घेण्यात यावा. यातील लाभार्थ्यांची निकड वसूलीचे प्रमाण याबाबतच्या यशापशयावर योजना पुढे चालू ठेवणेबाबत निर्णय घेण्यात येईल. महामंडळानी एक वर्षानंतर याबाबतची सविस्तर माहिती शासनास सादर करावी. सदर योजनेचे समवर्ती मुल्यमापन ( Concurreut Evaluation ) गोखले इन्स्टिटयुट अथवा टाटा सामाजिक विज्ञान संस्था, मुंबई यासारख्या संस्थांकडून संबंधित मागासवर्ग विकास महामंडळाने करुन घ्यावे.

७. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ९९३/व्यय-१४, दिनांक ४.११.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ना. ना. भडीकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे.

संचालक,विमुक्त जाती व भटक्या जमाती, महाराष्ट्र राज्य,पुणे

...५/-

महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई-१ / नागपूर-२
महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट राज्य, मुंबई-१ / नागपूर-२
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळ,मुंबई.
वित्त विभाग (का.व्यय १४,का.साउ),मंत्रालय,मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, नियोजन / अर्थसंकल्प, सा.न्या.सां.का.क्री.व वि.स.विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती - कार्या.विघयो-२